आस्थापना- कोकण विभाग,
विभागीय आयुक्त, कोकण विभाग,कोकण भवन प्रशासकीय इमारतीमधील साफसफाईच्या कामासाठी मंजूर १५ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२५ ते दिनांक ३१/०८/२०२५ या कालावधी पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएसटी- २०२४/प्र.क्र.३१/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ एप्रिल, २०२५.

**संदर्भ:-**
१. महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.संकिर्ण-१००२/प्र.क्र. ६६ (भाग-२)/ई-८, दि. २०/०३/२००६.
२. महसूल व वन विभाग ,शासन निर्णय, क्र. ईएसटी-२०१७/प्र.क्र.३२/ई-८, दि.१५/०४/२०१७
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०१९/प्र.क्र.३२/ई-८, दि.२२/१०/२०१९
४. वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क.,दि.३१/०८/२०२३ व शासन शुध्दिपत्रक, दि.०६/०९/२०२३.
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्रमांक ईएसटी-२०२२/प्र.क्र.५२/ई-८,दि.२०/०९/२०२३
६. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२१/०२/२०२४
७. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. इएसटी- २०२४/प्र.क्र.३१/ई-८,दि.१५/०३/२०२४ व दि.२७/०९/२०२४
८. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०६/०९/२०२४.
९. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३/०३/२०२५.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या दिनांक ०६/०९/२०२४ च्या शासन निर्णयास अनुसरुन विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन प्रशासकीय इमारतीमधील साफसफाईच्या कामासाठी मंजूर असलेल्या आकृतीबंधाबाहेरील १५ अस्थायी पदांना दिनांक ०१/०९/२०२४ ते दिनांक २८/०२/२०२५ या कालावधीसाठी महसूल व वन विभागाच्या संदर्भाधिन दिनांक २७/०९/२०२४ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२.	वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०३/०३/२०२५ अन्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२५ ते दिनांक ३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन कोकण भवन प्रशासकीय इमारतीमधील साफसफाईच्या कामासाठी मंजूर असलेल्या आकृतीबंधाबाहेरील १५ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२५ ते दिनांक ३१/०८/२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन प्रशासकीय इमारतीमधील साफसफाईच्या कामासाठी मंजूर असलेल्या आकृतीबंधाबाहेरील संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामधील १५ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२५ ते दिनांक ३१/०८/२०२५ या कालावधीसाठी वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०३/०३/२०२५ रोजीच्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२.	सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च संदर्भाधीन क्र. ०२ येथील शासन निर्णयासोबतच्या संबंधित विवरणपत्रातील रकाना क्रमांक ०६ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०२५-२०२६ साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

३.	वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०३/०३/२०२५ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक असल्याचे तसेच यानंतर सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची सर्व प्रशासकीय विभागांनी नोंद घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे.

४.	सदर शासन निर्णय, वित्त विभाग,क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०३/०३/२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०४०११५१११९६७१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.04.01 15:12:14 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)) १, महाराष्ट्र, मुंबई.
३. अपर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
४. सह सचिव/उप सचिव,कार्यासन व्यय-९/आ.पु.क.,वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
५. उप सचिव, (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. निवड नस्ती, (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.